**कार्यकारी अभियंता (स्थापत्य)**
**यांच्या बदल्या / पदस्थापना.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-११२०/प्र.क्र. ६० (४) /सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १० ऑगस्ट, २०२०

**संदर्भ :** सा. बां. विभाग शासन आदेश क्रमांक : टीएफएस-११२०/प्र.क्र. ६०(१२)/सेवा-१, दिनांक ७.८.२०२०

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन शासन आदेशान्वये श्री. अ. ल. पवार, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदुरबार यांची बदली सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या कारणास्तव, श्रीमती व. म. घुगरी यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग, धुळे या पदावर करण्यात आली होती.

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४), व ४(५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, संदर्भाधीन आदेशामध्ये अंशत: बदल करण्यात येत असून श्री. अ. ल. पवार यांची सुधारित पदस्थापना त्यांच्या विनंतीस अनुलक्षून तसेच सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या कारणास्तव, श्री. यो. बा. कुलकर्णी यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नाशिक या पदावर करण्यात येत आहे.

२. कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग, धुळे या पदावर अन्य अधिकाऱ्याची पदस्थापना स्वतंत्रपणे करण्यात येईल.

३. श्री. पवार यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती ही अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा. विहीत कालावधीत अधिकारी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्याचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

५. श्री. पवार यांची बदली त्यांच्या विनंतीस अनुलक्षून करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहणार नाही.

६. श्री. पवार यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१०२१०७५१५९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kisanrao Babanrao Palande

Digitally signed by Kisanrao Babanrao Palande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514911d765e05f227cdbfc15f18f6435e0084f59637ab95f9aefeebc40be45e7, cn=Kisanrao Babanrao Palande
Date: 2020.08.11 19:40:47 +05'30'

(किसनराव ब. पलांडे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास व पंचायतराज विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे,
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
५. मुख्य अभियंता व सह सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
९. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
१०. सर्व अधीक्षक अभियंते,सार्वजनिक बांधकाम विभाग,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार / धुळे / नाशिक,
१३. श्री. अ. ल. पवार , कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदुरबार,
१४. श्री. यो. बा. कुलकर्णी, कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नाशिक,
१५. श्रीमती व. म. घुगरी, कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग, धुळे,
१६. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१७. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१८. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१९. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
२०. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२१. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२२. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. सार्वजनिक बांधकाम विभाग / आस्था-१, आस्था-२, आस्था-३, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
२४. निवडनस्ती.